**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक- पोप्रमा-०९१६/प्र.क्र.६७४/पोल-७.**
मंत्रालय, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक १६ मार्च २०१७.

**<u>विषय</u>** :- राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.७, दौंड, जि. पुणे, येथील वसाहतीत आर.बी.सी. तंत्रज्ञानावर आधारित तीन लाख लिटर प्रतिदिन क्षमतेचा "Sewage Treatment Plant" बसविणेबाबत.

**<u>संदर्भ</u>** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२७-बी/ २८-बी/ आर.बी.सी.प्रणाली बसविणे-गट क्र.७-दौंड/३७१/२०१६, दिनांक ०३.०३.२०१६.

**ज्ञापन**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.७, दौंड, जि. पुणे, येथील वसाहतीत आर.बी.सी. तंत्रज्ञानावर आधारित तीन लाख लिटर प्रतिदिन क्षमतेचा "Sewage Treatment Plant" बसविणेबाबत प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु. २,४३,३१,३२०/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, पुणे, यांनी प्रमाणित केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते रु.२,५२,४०,९०२/- असे सुधारित केले आहेत. त्या अनुसार राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.७, दौंड, जि. पुणे, येथील वसाहतीत आर.बी.सी. तंत्रज्ञानावर आधारित तीन लाख लिटर प्रतिदिन क्षमतेचा "Sewage Treatment Plant" बसविण्याकरीता **रु.२,५२,४०,९०२/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास याद्वारे, पुढील अटीवर, मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

**अट :-** खर्चाच्या अंदाजात "Sewage Treatment Plant" ची क्षमता ही तीन लाख लिटर प्रतिदिन इतकी नमूद करण्यात आली आहे. इतक्या क्षमतेच्या "Sewage Treatment Plant" आवश्यकतेबाबत सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेण्यात यावी.

**४.** ही मान्यता, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच, मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त असलेल्या अधिकाराचा वापर करत, प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(००)(०१), जिल्हा पोलीस बल (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८९/इमा-२, दिनांक १६.०२.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३१७१२४१५०६८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.17 12:42:53 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, पुणे.
५) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.७, , दौंड, जि.पुणे.
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रदेश, पुणे.
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, पुणे.
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
११) निवड फाईल (पोल-७).